**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२२/प्र.क्र.४०/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:-२९ मार्च, २०२३

<u>वाचा</u>:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २२.०७.२०२२

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक२७.०७.२०२२

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९.०९२०२२.

५) महसूल व वन विभाग, शासन समक्रमांक दिनांक २२.१२.२०२२ रोजीचे पत्र.

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२४/२०२२-२३/५६६, दिनांक २३.१२.२०२३

७) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०३.०१.२०२३

८) प्रधान मुख्य वनसंरक्षक ,(नियोजन व विकास ,अर्थसंकल्प) नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.२४/२०२२-२३/६७४, दिनांक २५.०१.२०२३

९) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०८.०२.२०२३

१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.२४/७५९/२०२२-२३, दिनांक २१.०२.२०२३

११) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०२.०३.२०२३

१२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६.०३.२०२३

१३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष/पी/१-नबाप्र/प्र.क्र.२४/२०२२-२३, दिनांक २१.०३.२०२३

१४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१ पी/समर्पीत अहवाल/९२३/२०२२-२३, दिनांक २८.०३.२०२३

<u>प्रस्तावना</u>:-

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०२२-२३ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)"** या योजनेंतर्गत ०२-मजूरी या उद्दिष्टांकरीता रु.५२१६६.२७ लक्ष तसेच २१-पुरवठा व सामग्री या उद्दिष्टांकरीता रु.२२२४७.३७ लक्ष असे एकूण रु.**७४४१३६.६४ लक्ष** सुधारित अंदाज निश्चति करण्यात आले आहेत. त्यापैकी संदर्भाधीन क्रमांक २,३,४,७ व ११ येथील शासन निर्णयान्वये सदर दोन्ही उद्दिष्टांतर्गत एकूण **रु.७४४१३.६३९ लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे.**

०२. वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०२२-२३ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)"** या योजनेंतर्गत प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक १३ येथील दिनांक २१.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये रु.४३०.५८ लक्ष रकमेचा पूर्व पावसाळी कामांचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक १४ येथील दिनांक २८.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सदर योजनेंतर्गत संदर्भाधीन क्र. २,३,४,७ व ११ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीपैकी मुख्य वनसंरक्षक (प्रा.) अमरावती यांनी रु.१४०.६४ लक्ष तसेच मेळघाट व्याघ्र प्रकल्प अमरावती यांनी रु.६९.१० लक्ष निधी (एकूण रु.२०९.७४ लक्ष) नियंत्रण अधिकारी यांना समर्पित केला असून सदर निधी दिनांक २१.०३.२०२३ रोजी शासनास मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देवून सदर समर्पित करण्यात आलेला रु.२०९.७४ लक्ष निधी वितरीत करण्याची विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने सदर समर्पित करण्यात आलेल्या निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात (००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या योजनांतर्गत संदर्भाधीन क्र. २,३,४,७ व ११ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीपैकी मुख्य वनसंरक्षक (प्रा.) अमरावती यांनी रु.१४०.६४ लक्ष तसेच मेळघाट व्याघ्र प्रकल्प अमरावती यांनी रु.६९.१० लक्ष निधी (एकूण रु.२०९.७४ लक्ष) नियंत्रण अधिकारी यांना समर्पित केला आहे. सदर समर्पित करण्यात आलेला रु. २०९.७४ लक्ष निधी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विका), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र.१३ येथील दिनांक २८.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास केलेल्या विनंतीनुसार वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम या योजनांतर्गत योजनेकरिता ०२-मजुरी व २१-पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टांतर्गत पुढीलप्रमाणे निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम अंतर्गत** | **वितरित करावयाचा निधी** (रक्कम लाखात) | | |
|---|---|---|---|
| | **०२ -मजूरी** | **२१ - पुरवठा व सामुग्री** | **एकूण** |
| वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | १५९.२० | ५०.५४ | २०९.७४ |

०२. उपरोक्त संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. २ मध्ये चेनलिंक फेन्सिंगबाबत नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अनुषंगाने कार्यवाहीची पुर्तता केल्याबाबत अहवाल Geo Tag Photos आणि उपयोगिता प्रमाणपत्र (UC) यांचेसह ७ दिवसांत शासनास सादर करण्याच्या अटीवर निधी वितरीत करण्यात यावा. तसेच या शासन निर्णयान्वये वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम योजनेंतर्गत वितरीत करण्यात येत असलेल्या निधीतून देखील ज्या वनवृत्तात चेनलिंक फेन्सिंगची कामे करण्यात

येणार आहेत त्या वनवृत्तांना संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक २ मधील अटी लागू असतील याची संनियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

०३. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वेळोवेळी देण्यात आलेल्या सुचनांच्या अनुषंगाने कार्यवाही न झाल्यास त्याबाबत सर्वस्वी जबाबदारी ही नियंत्रण अधिकारी यांची राहील.

०४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) हे वर्ष २०२२-२३ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतील.

०५. ज्या प्रकरणी वन परिक्षेत्र अधिकारी/सहायक वनसंरक्षक यांनी त्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराबाहेर तांत्रिक/प्रशासकीय मान्यता दिली आहे, अशा प्रकरणी सक्षम अधिकाऱ्यांनी सुधारित तांत्रिक/प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे, याबाबत खातरजमा करुनच प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे यांनी सदर निधी वितरीत करावा. तांत्रिक/प्रशासकीय मान्यता दिल्याची खातरजमा करुनच सदर निधी वितरीत करण्यात यावा.

०६. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२२-२३ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०७. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १, ९ व १२ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०८. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०९. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन कार्यक्रम (४४०६ ०४९२ ).**
**०२- मजूरी, २१- साहित्य व पुरवठा**

१०. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३, दिनांक १६.०३.२०२३ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१८४२३९२२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK
BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.03.31 12:04:16 +05'30'

**(विनायक बा. इंगळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
**१६.** निवडनस्ती फ-११.